राष्ट्रीय छात्रसेना कार्यालयांना शिबीरे व प्रशिक्षणे आयोजनाप्रित्यर्थ निधी वितरणास प्रशासकीय मंजुरी मिळणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : राछासे २७१६ /प्र.क्र.१४१ /क्रीयुसे -३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : ०५ डिसेंबर, २०१६.

वाचा:-

१) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थसं-३, दि.२० एप्रिल, २०१६ .
२) क्रीडा व युवक सेवा पुणे यांचे पत्र क्रमांक.एनसीसी/शिबीरेप्र/२०१६-१७(३)/का-५/४७४५ दि. १९ नोव्हेंबर, २०१६.
३) क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्र. एनसीसी/शिबीरेप्र/२०१६-१७/(३)/का-५, दि. २/१२/२०१६.

**प्रस्तावना : -**

महाराष्ट्रातील राष्ट्रीय छात्रसेना कार्यालयांना शिबीरे व प्रशिक्षणे आयोजनाप्रित्यर्थ राज्य शासनाकडून उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या २५ % अनुदानाची रक्कम अदा करणेसाठी सन २०१६-१७ या कालावधीत प्रस्तुत उपक्रमांच्या अंमलबजावणीकरिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रु.११.००कोटी इतक्या तरतुदीपैकी ८० टक्केच्या मर्यादेत रु. ८.८० कोटी इतक्या निधीपैकी रु. १६,८२,४६४/- इतक्या रकमेचा निधी वितरीत करण्याची बाब या नस्तीवर विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्रातील राष्ट्रीय छात्रसेना कार्यालयांना शिबीरे व प्रशिक्षणे आयोजनाप्रित्यर्थ राज्य शासनाकडून उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या २५% अनुदानाची रक्कम अदा करणेसाठी सन २०१६-१७ या कालावधीत प्रस्तुत उपक्रमांच्या अंमलबजावणीकरिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रु.११.००कोटी इतक्या तरतुदीच्या, ८० टक्केच्या मर्यादेत रु. ८.८० कोटी इतक्या निधीपैकी रु.१६,८२,४६४/- इतका निधी संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयान्वये, वितरीत करण्यास व सदर रक्कम आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र . | कार्यालयाचे नाव | विषय | मंजूर निधी |
|---|---|---|---|
| १ | ५ महा.मुलींचे पथक, मुंबई | प्रशिक्षण शिबीर<br>दि. १९/११/१६ ते २८/११/१६ | रु.३,३९,९४०/- |
| २ | ८ महा. बटालियन, मुंबई | प्रशिक्षण शिबीर<br>दि. ५/१२/१६ ते २०/१२/१६ | रु.४,२१,०१२/- |
| ३ | २ महा.नाविक दल, रत्नागिरी | प्रशिक्षण शिबीर<br>दि. १६/१२/१६ ते २६/१२/१६ | रु.९,२१,५१२/- |
| | | **एकूण रक्कम =** | **रु.१६,८२,४६४/-** |

२. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च "मागणी क्रमांक : ई-३, २२०४-क्रीडा व युवक सेवा-१०२, विद्यार्थ्यांसाठी युवक कल्याण कार्यक्रम (०१)(०१) राष्ट्रीय छात्रसेना योजनेतर (२२०४-००१६-२१) या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहेत त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

३. वित्त विभागाच्या दि.२४/०७/२०१५ च्या शासन परिपत्रकानुसार खालील बाबी नमूद करण्यात येत आहेत.

३.१ . वित्त विभागाच्या दि.२०/०४/२०१६ च्या शासन परिपत्रकान्वये निधी वितरणाचे अधिकार विभागास आहेत.

३.२. ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षातंर्गत गतवर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

३.३. दि.२४/०७/२०१५ च्या आदेशातील इतर मुद्दे या आदेशास लागू नाहीत.

३.४. परिपत्रकातील “अ” व “ब” ची पूर्तता होत आहे.

४. वित्त विभागाच्या दि. २४/०७/२०१५ व दि. २०/०४/२०१६ च्या परिपत्रकातील सूचनांनुसार उपरोक्त तरतूद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी संबंधित समादेशक अधिकारी यांना आंहरण व संवितरण अधिकारी तर विभागीय उपसंचालक (क्रीडा) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.२०/०४/२०१६ च्या परिपत्रकातील सूचनांना अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील परिच्छेद ७ ते १८ मधील अटींची तसेच परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील मुद्दा क्र. १,२,३,४,५,६,७ व ८ मधील बाबी सदर आदेशास लागू नाहीत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२०५१७२५०२९२२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Charushila D Chaudhari

Digitally signed by Charushila D Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b99d7dca0e63be1bd1b7158b9523537dcc1d46bc807768647a9ed4ff3816ecf3, cn=Charushila D Chaudhari
Date: 2016.12.05 17:27:04 +05'30'

( चारुशीला चौधरी )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मंत्री (शालेय शिक्षण व क्रीडा) यांचे खाजगी सचिव

२. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
५. महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
६. वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई.
७. अतिरिक्त महासंचालक, राष्ट्रीय छात्रसेना, मुंबई.
८. सर्व उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा (संचालनालयामार्फत)
९. निवडनस्ती, क्रीयुसे-३.